वीजदर सवलत योजनेतील NPA
**प्रमाणपत्राची अट रद्द करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: सपववि-४१०१२/१९/२०२३-DESKTEX५**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :-२१ जुलै, २०२३

वाचा :-

१) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. धोरण-२०१७/प्र.क्र.६/टेक्स-५, दिनांक १५ फेब्रुवारी, २०१८.
२) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. धोरण-२०१८/प्र.क्र.१६४९/टेक्स-५, दिनांक २१ डिसेंबर, २०१८.
३) शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र. धोरण-२०१८/प्र.क्र.१६४९/टेक्स-५, दिनांक २२ ऑक्टोबर, २०२१.

**प्रस्तावना :-**

राज्याचे वस्त्रोद्योग धोरण २०१८-२३ ची अंमलबजावणी करताना २७ अश्वशक्तीपेक्षा कमी व २७ अश्वशक्तीपेक्षा जास्त जोडभार असलेले यंत्रमाग घटक, सहकारी सूतगिरणी, प्रक्रिया उद्योग, खाजगी सूतगिरणी, निटींग, होजीअरी आणि गारमेंटींग इत्यादी सर्व वस्त्रोद्योग घटकांना वीज दर सवलत संदर्भाधीन क्र.२ अन्वये सुरु करण्यात आली आहे. वीज दर सवलत योजनेच्या शासन निर्णयात नमुद केल्यानुसार वीज दर सवलत मिळण्यासाठी संबंधित वस्त्रोद्योग घटकाने आयुक्त (वस्त्रोद्योग), यांच्या वेबसाईटवर ऑनलाइन अर्ज सादर करणे आवश्यक आहे. वस्त्रोद्योगाकरीता वीज दर अनुदान योजनेत चालू असलेले गैरप्रकार थांबविण्यासाठी वस्त्रोद्योग प्रकल्पांच्या वीज सवलत मागणीच्या प्रस्तावांची सखोल तपासणी व्हावी व होणाऱ्या गैरप्रकार थांबविण्यासाठी उपाययोजना करण्याच्या अनुषंगाने संदर्भाधीन क्र.३ येथील  शासन निर्णय निर्गमित करण्यात आला होता. सदर शासन निर्णयानुसार प्रकल्प NPA झाला नसल्याची खात्री करणेसाठी त्यासाठीचे बँकेचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक होते.

वस्त्रोद्योग घटक वीज वापर करीत असल्यामुळेच शासनाव्दारे वीजदर सवलतीचे अनुदान वितरीत होत असते. त्यामुळे सदर वस्त्रोद्योग घटकाच्या बॅकेचे NPA प्रमाणपत्र जरी असले तरी उत्पादन सुरू असले तर NPA ची अट शिथिल / रद्द केल्यास त्या वस्त्रोद्योग घटकास वीजदर सवलतीच्या अनुदानामुळे वस्त्रोद्योग घटक चालविण्यास चालना मिळून त्या घटकातील रोजगार पूर्णपणे बंद होणार नाही त्यामुळे वस्त्रोद्योग धोरण अंतर्गत रोजगाराच्या संधी तयार करणे, वस्त्रोद्योगाचा विकास करणे हे उद्यिष्टे  पुर्ण होईल.

राज्यातील वस्त्रोद्योग घटकांना वीजदर सवलत योजनेचा लाभ घेताना येणाऱ्या अडचणी विचारात घेता   संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्टातील NPA प्रमाणपत्र सादर करण्यासंदर्भातील अट क्र.४  रद्द करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

वस्त्रोद्योग विभागामार्फत वस्त्रोद्योग वीज अनुदान योजनेत चालू असलेले गैरप्रकार थांबविण्यासाठी वस्त्रोद्योग प्रकल्पांच्या वीज सवलत मागणीच्या प्रस्तावांची सखोल तपासणी व्हावी व होणाऱ्या गैरप्रकार थांबविण्यासाठी उपाययोजना करण्याबाबतच्या संदर्भ क्र. ३ येथील शासन

निर्णयासोबतच्या परिशिष्टामधील NPA प्रमाणपत्र सादर करण्यासंदर्भातील अट क्र. ४ या शासन निर्णयाद्वारे रद्द करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०७२११३२६१०५००२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHRIKRISHNA
BABURAO
PAWAR

Digitally signed by SHRIKRISHNA BABURAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA,
ou=REVENUE AND FORESTS DEPARTMENT,
2.5.4.20=631cf5e4544a7032340c686106b15138df3ef3
b889e86fb2026c1add12d27e41, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=2FAFF40BB05D156355556F7264A3A59
AD12DD42F183422309976C41CE28C0A1D,
cn=SHRIKRISHNA BABURAO PAWAR
Date: 2023.07.21 13:33:54 +05'30'

**( श्रीकृष्ण पवार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपालांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (सर्व), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानसभा यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय विधानभवन, मुंबई
६. मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,विधानभवन, मुंबई
७. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य , मंत्रालय, मुंबई.
८. सर्व अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सचिव (वस्त्रोद्योग), मंत्रालय, मुंबई.
१०. अध्यक्ष तथा व्यवस्थापकीय संचालक, महावितरण कंपनी, मुंबई ४०००५१.
११. आयुक्त (वस्त्रोद्योग), वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर
१२. उद्योग, उर्जा व कामगार विभाग, कार्यासन- उर्जा-५ / ऊर्जा-३
१३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ मर्या.
१४. अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, कार्यासन टेक्स- १अ / टेक्स-१ब / टेक्स-२ / टेक्स-३ / टेक्स-४ / रेशीम कक्ष
१५. निवड नस्ती (कार्यासन टेक्स-५)